**“मा.बाळासाहेब ठाकरे** स्मृती मातोश्री
ग्रामपंचायत बांधणी योजनेच्या प्रचलीत
धोरणात सुधारणा करण्याबाबत.”

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः ग्रापंई २०१८/प्र.क्र. ५३/बांधकाम-४

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०० ००१.
तारीख: २ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः ददभू-२०१०/प्र.क्र.६२ /पंरा -६ दि .१६ सप्टेंबर, २०१०
२) शासन निर्णय क्रमांक- रागापं-२०१२/प्र.क्र.९२/योजना-४ दि. ०३ मार्च २०१४
३) शासन निर्णय क्रमांकः जीपीडीपी- २०१५/प्र.क्र.३८ /पंरा -६ दि .०४ नोव्हेंबर, २०१५
४) शासन निर्णय क्रमांक- विकास २०१५/प्र.क्र.२७४/यो- ६ दि. १६ डिसेंबर, २०१५
५) शासन निर्णय क्रमांक- ग्रापंई २०१७/प्र.क्र.२४६ /बांधकाम-४ दि. २३ जानेवारी, २०१८

**प्रस्तावना :-**

१. महाराष्ट्रामध्ये आजमितीस एकूण २८,००६ ग्रामपंचायती, ३५१ पंचायत समित्या व ३४ जिल्हा परिषदा कार्यरत आहेत. ७३ व्या घटना दुरुस्तीनंतर पंचायतराज संस्थांकडे राज्य शासनाने विविध योजनांच्या अंमलबजावणीची जबाबदारी सोपविलेली आहे. या पंचायतराज संस्थांमध्ये सध्या १,९७,३३८ ग्रामपंचायत सदस्य, ४,००४ पंचायत समिती सदस्य व २,००२ जिल्हा परिषद सदस्य कार्यरत आहेत. राज्यातील एकूण २८,००६ ग्रामपंचायतीपैकी जवळपास ४,२५२ ग्रामपंचायतींना स्वत:च्या कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत नाही. त्यामुळे, ग्रामीण भागासाठी पायाभूत सुविधांची असणारी आवश्यकता व त्यासाठी उपलब्ध असणाऱ्या स्त्रोतांची उणीव लक्षात घेऊन “ मा.बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजना ” ही नवीन योजना शासन निर्णय दि. २३ जानेवारी, २०१८ अन्वये सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेच्या प्रचलित धोरणात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**१.** राज्यातील ज्या ग्रामपंचायतींना स्वत:च्या कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत नाही, अशा ग्रामपंचायतींना स्वतंत्र कार्यालयाची इमारत बांधण्यासाठी मा.बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेच्या प्रचलित धोरणात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(१) मा. बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजने अंतर्गत शासन निर्णय दि. २३ जानेवारी, २०१८ अन्वये निर्धारीत केलेली १००० ते २००० पर्यत लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींनी स्वत:चे ग्रामपंचायत कार्यालय बांधण्यासाठी सार्वजनिक- खाजगी -भागीदारी (PPP) च्या धर्तीवर बांधकाम करण्याबाबत किमान दोन वेळा प्रयत्न करण्याची केलेली तरतूद या शासन निर्णयान्वये वगळण्यात येत आहे.

(२) शासन निर्णय,दिनांक २३ जानेवारी २०१८ अन्वये १०००-२००० लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींना ग्रामपंचायत कार्यालय बांधण्यासाठी निर्धारित केलेल्या रु. १८.०० लक्ष मूल्याच्या १०% रक्कम ग्रामपंचायतींनी त्यांच्या स्व:निधीतून खर्च करण्याचे व उर्वरित ९०% रक्कम शासनाकडून खर्च करावयाची होती.

**त्याऐवजी**, या गटातील ग्रामपंचातींनी ग्रामपंचायत कार्यालय बांधण्यासाठी निर्धारित केलेल्या रु. १८.०० लक्ष मूल्याच्या ८५ % म्हणजेच रु. १५.३० लक्ष लक्ष इतकी रक्कम शासनामार्फत व उर्वरीत १५% प्रमाणे रु.२.७० लक्ष इतकी रक्कम ग्रामपंचायतीने स्व-निधीतून खर्च करावयाची आहे.

(३) शासन निर्णय,दिनांक २३ जानेवारी २०१८ अन्वये २००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींनी त्यांच्या ग्रामपंचायतीचे कार्यालय स्व-निधीतून अथवा सार्वजनिक-खाजगी -भागीदारी (PPP) च्या धर्तीवरच बांधकाम करावयाचे होते.

**त्याऐवजी,** २००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या व स्वत:ची ग्रामपंचायत कार्यालय नसलेल्या ग्रामपंचायतींचाही या योजनेअंतर्गत ग्रामपंचायत कार्यालय बांधकामासाठी समावेश करण्यात येत आहे. या गटातील ग्रामपंचायतीचे बांधकाम मुल्य रुपये १८.०० लक्ष इतके निर्धारीत करण्यात येत असून त्यापैकी ८० % म्हणजे रु.१४.४० लक्ष इतका निधी शासनामार्फत व उर्वरीत २० % प्रमाणे रु.३.६० लक्ष **अथवा** जो वाढीव लागेल तो खर्च संबंधीत ग्रामपंचायतींनी स्व-उत्पन्नातून खर्च करावयाचा आहे.

(४) एखाद्या ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये ग्रामपंचायत कार्यालयाचे बांधकाम सार्वजनीक -खाजगी-भागीदारी (PPP) तत्वावर करण्यास वाव असल्यास संबंधीत ग्रामपंचायतीने त्याबाबत ग्रामसभेचा ठराव केल्यानंतर जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी, मुख्य लेखा व वित्त अधिकारी (cafo) व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) यांच्या समितीने संबंधित ग्रामपंचायतीस त्याप्रमाणे सार्वजनीक -खाजगी-भागीदारी (PPP) तत्वावर ग्रामपंचायत कार्यालयाचे बांधकाम करण्यास परवानगी द्यावी.

**२.** सद्यस्थितीत स्वत:चे ग्रामपंचायत कार्यालय नसलेल्या कोणत्याही ग्रामपंचायतीचे बांधकाम दोन वेगवेगळया योजनेतून मंजुर होणार नाही याची संबंधीत जिल्हा परिषदेने दक्षता घ्यावी.

**३.** महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेतून ग्रामपंचायत बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन घेण्याबाबत प्रथमत: प्रयत्न करण्यात यावा. त्यानंतर, ग्रामपंचायत इमारत

बांधकामासाठी अतिरीक्त निधीची आवश्यकता असल्यास या योजनेअंतर्गत ग्रामपंचायत बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. प्रत्येक आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत प्रस्तुत योजनेतून ग्रामपंचायत बांधकामासाठी ग्रामपंचायतींची निवड करण्यात येईल.

**४.** सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौ.सं.क्र.१०५/२०१८/१४४४, दि. ३.१०.२०१८ व वित्त विभागाचा अनौ.सं.क्र.२४७/२०१८/व्यय-१५, दि.१२.१०.२०१८ अन्वये त्यांच्या सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१८११०२१६२१३९९१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2018.11.02 17:41:40 +05'30'

(र.आ.नागरगोजे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३) मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६) मा.सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक
७) सर्व विभागीय आयुक्त
८) सर्व जिल्हाधिकारी
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
१०) सर्व अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११) सर्व कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद
१२) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.), जिल्हा परिषद
१३) सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी ग्राम विकास विभाग
१४) वित्त विभाग (व्यय १५/अर्थसंकल्प-१७) , मंत्रालय, मुंबई
१५) नियोजन विभाग (कार्यासन- १४४४), मंत्रालय, मुंबई आदिवासी विभाग , मंत्रालय, मुंबई
१६) निवडनस्ती-बांधकाम-४